सैन्यातील धारातीर्थी पडलेल्या महाराष्ट्रातील अधिकारी/जवान यांच्या विधवा/अवलंबितांना आर्थिक मदत देण्याबाबत - शहीद जवान दिलीप धोंडिबा गांगर्डे, जि. अहमदनगर

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मासैम-२०२२/ प्र. क्र.७१/२८ (अर्थ)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :-१७/०३/२०२२.

वाचा

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम १०९९/१६६१/प्र.क्र.१२६/९९/२८, दिनांक ०४/१०/२०००
२) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६०२५/सैकवि-१६/४२१, दिनांक १०/०३/२०२२

प्रस्तावना

युध्दात, युध्दजन्य परिस्थितीमध्ये, तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत धारातीर्थी पडलेल्या राज्यातील सैनिकांच्या वारसांना /अपंगत्व आलेल्या सैनिकांना/तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत धारातीर्थी पडलेल्या सीमा सुरक्षा बल व इतर तत्सम निमलष्कर दलातील सदस्य / त्यांच्या कुटुंबियांना संदर्भाधिन दिनांक ०४/१०/२००० रोजीच्या शासन निर्णयान्वये आर्थिक मदत देण्यात येते. त्यानुसार सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी **शहीद हवलदार दिलीप धोंडिबा गांगर्डे**, जि. अहमदनगर या धारातीर्थी जवानांच्या अवलंबितांना आर्थिक मदत देणेबाबतचा प्रस्ताव उक्त संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

शासन निर्णय

सैनिक कल्याण विभागाने दिनांक ०४/११/२०२० च्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने,पुढील तक्त्यात नमूद केल्यानुसार,महाराष्ट्र राज्यातील धारातीर्थी पडलेले जवान,**हवलदार दिलीप धोंडिबा गांगर्डे** यांच्या अवलंबितांना आर्थिक मदत देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे

| नाव व पत्ता | मृत्यु दिनांक, मोहिम व ठिकाण | वारसांचे नांव व आर्थिक मदतीची रक्कम |
|---|---|---|
| **नं. ९१३१२१०५९<br>हवलदार<br>दिलीप धोंडिबा गांगर्डे,<br>मु.पो. कोंभळी,ता. कर्जत,<br>जि. अहमदनगर..** | १५/०४/२०१०<br>जम्मु काश्मिर राज्यातील सापोर येथे कार्यरत असताना झालेल्या दग़डफेकीमध्ये शहीद. | १)श्रीमती संगीता दिलीप गांगर्डे (वीरपत्नी) :-<br>रू. ३.०० लाख<br>२)श्रीमती जनाबाई धोंडिबा गांगर्डे (वीरमाता) :-<br>रू. २.०० लाख<br>मु.पो. कोंभळी, ता. कर्जत, जि. अहमदनगर, ४१४४०१ |
| | **एकूण** | **रुपये ५.०० /- लाख** |

२. धारातीर्थी पडलेल्या जवानाच्या अवलंबितास शासन अनुदानातून द्यावयाच्या रकमेपोटी होणारा खर्च रु. २,००,०००/-(रुपये दोन लाख फक्त) हा मागणी क्र. ए-५ लेखाशीर्ष "२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६० - इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०२ - सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतने, (००)(०४) देशांतर्गत/ सुरक्षासंबंधी मोहिमेत-चकमकीत धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना आर्थिक मदत (२२३५२६०८) ५० - इतर खर्च " या लेखाशीर्षामध्ये सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी मंजुर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. धारातीर्थी पडलेल्या जवानाच्या अवलंबितास एकूण अनुज्ञेय (रू. ५.०० लाख) रक्कमेपैकी रु.३,००,०००/- ( रु.तीन लाख फक्त) इतकी रक्कम मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयीकृत बँकेत सद्यस्थितीत गुंतविण्यात आलेल्या रकमेच्या व्याजातून अदा करण्यात यावी.

४. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, अहमदनगर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच सदर आर्थिक मदतीपैकी २०% रक्कम रोखीने व उर्वरीत ८०% रक्कम शहीद जवानाच्या कुटुंबियांना दरमहा नियमितपणे काही रक्कम मिळावी याद्दष्टीने कुटुंबियांच्या नावे मुदत ठेवीत गुंतविण्यात यावेत.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम १०९९/१६६१/प्र.क्र.१२६/९९/२८, दिनांक ०४/१०/२००० मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१७१२१८३१८८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shivaji gulabrao gore

Digitally signed by Shivaji gulabrao gore
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5a914ec7d72351a68d9f12e80317d7512bf6f19c34fee2557e3b3c882cce6f57, pseudonym=FBF0A6AA972F003B5B0C7967AD7B6A3C4FA38DC8, serialNumber=0FB38126D364A4D9F8873B7BC48B4369F1657CA258FC9C6479A27B4D539F409B, cn=Shivaji gulabrao gore
Date: 2022.03.17 12:20:27 +05'30'

**(शिवाजी गोरे)**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२
४. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
५. जिल्हाधिकारी, अहमदनगर,
६. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर,
७. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),
८. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, अहमदनगर,
९. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई - ३२,
१०. श्रीमती संगीता दिलीप गांगर्डे (वीरपत्नी) मु.पो. कोंभळी, ता. कर्जत, जि. अहमदनगर,४१४४०१.
११. श्रीमती जनाबाई धोंडिबा गांगर्डे (वीरमाता) मु.पो. कोंभळी, ता. कर्जत, जि.अहमदनगर,४१४४०१
१२. निवडनस्ती (२ प्रती).